**कै. श्री. मिलींद मनोहर देशपांडे, अधिव्याख्याता, अणुविद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेतन, मालवण यांची हंगामी सेवा नियमित करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग
**शासन निर्णय क्र. : आस्था-२००९/प्र.क्र.२८/०९/तांशि-७**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ जानेवारी, २०१७

**पहा :** १) मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्र. २०४६/२०१० च्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाचे दि.१९/१०/२०१३ चे आदेश.
२) मा. उच्च न्यायालय, नागपूर खंडपीठ येथे दाखल झालेल्या रिट पिटीशन क्र. २८०९/२००३ च्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालयाचे दि.१६/६/२०१६ च आदेश.

**प्रस्तावना :-**

कै.श्री.एम.एम. देशपांडे यांची अधिव्याख्याता, अणुविद्युत अभियांत्रिकी, शासकीय तंत्रनिकेन या पदावर दि.०७/०६/१९८४ पासून हंगामी तत्वावर प्रथमत: बारा महिन्यासाठी नियुक्ती करण्यात आली होती.त्यांना त्यानंतर वेळोवेळी सेवेमध्ये कोणताही खंड न देता मुदतवाढ देण्यात आलेली आहे. कै.श्री. देशपांडे यांनी त्यांची सेवा नियमित करण्याकरीता मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या याचिका क्र. ३०७/९० च्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर यांनी त्यांचे दि.०७/०२/१९९० च्या अंतरीम आदेशान्वये श्री. देशपांडे यांच्या हंगामी सेवा संपुष्टात आणण्यास शासनास प्रतिबंध केला होता. त्यानुसार श्री. देशपांडे हे सेवेमध्ये कोणतेही खंड न देता त्यांचे निधनापर्यंत म्हणजेच दि.२८/११/२००७ पर्यंत सुमारे २३ वर्ष ५ महिने हंगामी तत्वावर सेवेमध्ये कार्यरत होते.

२. उपरोक्त याचिका मा. न्यायालयात सुरु असताना दरम्यानच्या काळात श्री. सचिन अंबादास डवले व इतर शासकीय तंत्रनिकेतनातील कंत्राटी अधिव्याख्यात्यांनी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे याचिका क्र. २०४६/२०१० दाखल केली. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी दि. १९/१०/२०१३ रोजी खालीलप्रमाणे आदेश दिले आहेत.

"२२. The respondents are directed to regularize the services of such of the petitioners and confer permanency on such petitioners who have completed three years' service with technical breaks. The respondents shall absorb the petitioners within a period of six weeks. Needless to state that the petitioners who are in continuous employment till 15.10.2013 shall be continued in service as regular employees.

However, in the fact and circumstances of the case, we direct that the petitioners shall be entitled to regular salary from 1st November, 2013 and would not be entitled to claim any monetary benefits for the past services rendered by them in spite of their regularization. Needless to state that since the petitioner's services are regularized, they shall be entitled to the continuity in service for all other purposes except monetary purposes from the date of their first appointment.

३.	मा.उच्च न्यायालयाच्या उक्त आदेशाच्या अनुषंगाने व अधिव्याख्याता ही पदे लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील असल्याने याप्रकरणी विधी व न्याय विभागाने दिलेले अभिप्राय विचारात घेऊन या विभागाने मा. उच्च न्यायालयाच्या दि. १९/१०/२०१३ रोजीच्या आदेशाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालयात एस.एल.पी.(सिव्हील) क्र. ३९०१४/२०१३ दाखल केली. सदर विशेष अनुमती याचिकेच्या अनुषंगाने याचिकाकर्ते श्री. पंकज मधुकर भुयार व इतर यांनी मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या अवमान याचिका क्र. ५३१/२०१४ दाखल केली, या प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने दि. ०६/०१/२०१५ च्या सुनावणीवेळी शासनाने दाखल केलेली विशेष अनुमती याचिका क्र. ३९०१४/२०१३ खारीज केली आहे. मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने शासनाने दि.१४/०१/२०१५, दि.१३/०३/२०१५ व दि.२१/०३/२०१६ च्या शासन निर्णयांव्दारे अनुक्रमे ६२, ३१७ व ८६ कंत्राटी/हंगामी स्वरुपात कार्यरत असलेल्या अध्यापकांच्या सेवा नियमित करण्यात आल्या आहेत.

४.	श्री.मिलींद मनोहर देशपांडे त्यांचे निधनानंतर त्यांच्या पत्नी श्रीमती जयश्री मिलींद देशपांडे यांनी सेवानिवृत्ती वेतन व इतर लाभ मिळण्यासंदर्भात मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर येथे दाखल केलेल्या रिट याचिका क्र.२८०९/२००३ मध्ये मा. न्यायालयाने दि.१६/०६/२०१६ रोजी खालीलप्रमाणे आदेश पारित केले आहेत:

"...following earlier judgments and Government Resolutions, we direct respondents to treat deceased Milind as regularized with his date of entry into service as 1/6/1984. Consequently, all terminal /retiral benefits payable to him shall be worked out and shall be released to his heirs/dependents as per law within a period of six months from today. If widow or any other dependents is entitled to receive family pension, necessary exercise shall also be completed within this period..."

५.	मा. न्यायालयाच्या उपरोक्त आदेशानुसार कै.श्री. देशपांडे यांच्या हंगामी सेवा नियमित करुन त्यांच्या वारसदारांना कुटुंब निवृत्तीवेतनादी लाभ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त पार्श्वभूमी विचारात घेवून कै.श्री.मिलींद मनोहर देशपांडे यांच्या हंगामी सेवा मा.न्यायालयाच्या दि.१६/०६/२०१६च्या आदेशानुसार खालील विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे व पुढील अटी व शर्तीनुसार नियमित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिव्याख्यात्याचे नाव | प्रवर्ग | विद्याशाखा | कार्यरत संस्थेचे नांव | प्रथम नियुक्तीचा दिनांक | सेवा नियमित केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | कै.श्री.मिलींद मनोहर देशपांडे | खुला | अणुविद्युत अभियांत्रिकी | शासकीय तंत्रनिकेतन, मालवण | ०७/०६/१९८४ | ०७/०६/१९८४ |

१) श्री. मिलींद मनोहर देशपांडे यांच्या हंगामी स्वरुपातील सेवा प्रथम नियुक्तीच्या दिनांकापासून नियमित करण्यात येत आहे.
२) श्री. देशपांडे यांच्या सेवा मा. न्यायालयाने दिलेले आदेश व त्यांचे वारसांना देय असलेले कुटुंब निवृत्तीवेतन विषयक लाभ मिळावे या हेतूने नियमित करण्यात आलेली कार्यवाही भविष्यात पूर्वोधारण ठरणार नाही.
३) श्री. देशपांडे यांचे निधन झालेले असल्यामूळे त्यांच्या वारसदारास त्यांचे कुटुंब निवृत्ती वेतनादी लाभ अनुज्ञेय राहतील.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०१०९१५४५२२०४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sudhir Jaya Shetty

Digitally signed by Sudhir Jaya Shetty
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, serialNumber=e9d37d499a521b728aeb3dc8ec38b759420308b9fd7816002b4af0ffbf1111d7, cn=Sudhir Jaya Shetty
Date: 2017.01.09 15:49:46 +05'30'

**( सुधीर जया शेट्टी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

कै .श्री. मिलींद मनोहर देशपांडे, शासकीय तंत्रनिकेतन, मालवण, (संस्थेमार्फत त्यांच्या पत्नी श्रीमती जयश्री मिलींद देशपांडे यांना बजावण्यात यावी.)

**प्रत:**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्रशिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
९. उप सचिव (तंशि), उच्च व तंत्रशिक्षण यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. सहसंचालक, तंत्रशिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई.
१२. प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतन, मालवण. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत).
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई.
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
१५. निवड नस्ती-७.